**मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रम फेलोंच्या निवडीचे निकष, अटी व शर्ती आणि कार्यक्रमाच्या अंमलबजावणी बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण- २०२५/प्र.क्र. १२ /का.१४२६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ३ एप्रिल, २०२५

**संदर्भ** :- १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.४००/२०१४/१२ दिनांक २० मे, २०१६.
२. नियोजन विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण -२०२३/प्र.क्र.१/का.१४२६, दिनांक २० जानेवारी २०२३,
३. अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई यांचे पत्र क्र.असांस/विश्लेषण/मुफेका-२०२४/१२ दिनांक १०/०१/२०२५,

**प्रस्तावना :-**

संदर्भिय शासन निर्णयान्वये २०२३-२४ या कालावधीत "मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रम" राज्यात राबविण्यात आला होता. राज्यातील विकास प्रक्रिया व त्यातील टप्पे जाणून घेता यावेत व ते समजून घेत असताना शासकीय यंत्रणेतील कामकाज, त्यातील घटकांचा ताळमेळ व निर्णय प्रक्रियेचा अनुभव तरुणांनी मिळवावा त्यातून समर्पित वृत्तीने समाजसेवा करण्यासाठी प्रामाणिक, ध्येयवादी, सुजाण नागरिक तयार व्हावेत या करीता मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रम राबविण्यात आला होता. या कार्यक्रमाच्या माध्यमातून राज्यातील तरुणांना प्रशासनासोबत काम करण्याचा अनुभव मिळाला व त्या सोबतच त्यांच्या ज्ञानाच्या, अनुभवाच्या कक्षा रुंदावण्यास मदत झाली. तरुणांमधील कल्पकता व वेगळा विचार मांडण्याची क्षमता याचा उपयोग प्रशासनास झाला आणि तरुणांमधील उत्साह, तंत्रज्ञानाची आवड या माध्यमातून प्रशासकीय प्रक्रियांना गती मिळाली.

संदर्भिय शासन निर्णयान्वये फेलोंना भविष्यातील वाटचालीस उपयुक्त ठरेल या दृष्टीने सदर कार्यक्रमास शैक्षणिक कार्यक्रमाची जोड देण्यासाठी देशातील नामांकित शैक्षणिक संस्थांना सहभागी करून घेण्यात आले होते. त्यानुषंगाने मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रम २०२५-२६ ची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

**१.** मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी आणि त्या अनुषंगाने फेलोंच्या निवडीचे निकष, अटी व शर्ती निश्चित करण्याच्या दृष्टीने तसेच नामांकित शैक्षणिक संस्थांमार्फत राबविण्यात येणाऱ्या शैक्षणिक कार्यक्रमाची रूपरेषा ठरविण्याच्या दृष्टीने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**२.** "मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रम" २०२५-२६ करिता फेलोंच्या निवडी संदर्भातील निकष, फेलोंच्या नियुक्ती संदर्भातील अटी व शर्ती तसेच शैक्षणिक संस्थांमार्फत राबविण्यात येणाऱ्या शैक्षणिक कार्यक्रमाची रूपरेषा व अंमलबजावणी बाबत खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

**(अ) कार्यक्रमाची अंमलबजावणी**:

या कार्यक्रमाची अंमलबजावणी नियोजन विभागाच्या अधिनस्त अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र शासन यांच्यामार्फत करण्यात यावी.

**(ब) फेलोंच्या निवडी संबंधातील निकष :-**

**(१)** अर्जदार भारताचा नागरिक असावा.

**(२) शैक्षणिक अर्हता :-** कोणत्याही शाखेतील पदवीधर (किमान ६०% गुण आवश्यक) असावा.

**(३) अनुभव :-** किमान १ वर्षाचा पूर्णवेळ कामाचा अनुभव आवश्यक राहील. तसेच, व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांसाठी त्यांच्या अभ्यासक्रमाचा भाग म्हणून पूर्णवेळ इंटर्नशिप / अप्रेंटीसशिप / आर्टीकलशिपसह १ वर्षाचा अनुभव आवश्यक राहील. पूर्णवेळ स्वयंरोजगार, स्वयंउद्योजकतेचा अनुभवही ग्राह्य धरण्यात येईल. अर्जदारास तसे स्वयंघोषणापत्र सादर करावे लागेल.

**(४) भाषा व संगणक ज्ञान :-** मराठी भाषा लिहिता, वाचता व बोलता येणे आवश्यक राहील. हिंदी व इंग्रजी भाषेचे पुरेसे ज्ञान असणे आवश्यक राहील. तसेच, संगणक हाताळणी आणि इंटरनेटचे ज्ञान आवश्यक राहील.

**(५) वयोमर्यादा :-** उमेदवाराचे वय अर्ज सादर करावयाच्या अंतिम दिनांकास किमान २१ वर्षे व कमाल २६ वर्षे असावे.

**(६) अर्ज करावयाची पद्धत :-** अर्थ व सांख्यिकी संचालनालयाद्वारे विहीत केलेल्या ऑनलाईन ॲप्लिकेशन प्रणालिद्वारे उमेदवाराने अर्ज करावयाचा आहे.

**(७)** अर्जाकरिता आकारण्यात येणारे शुल्क:- रुपये ५००/-

**(८) फेलोंची संख्या :-** सदर कार्यक्रमात फेलोंची संख्या ६० इतकी निश्चित करण्यात आली असून, त्यापैकी महिला फेलोंची संख्या फेलोंच्या एकूण संख्येच्या १/३ राहील. १/३ महिला फेलो उपलब्ध न झाल्यास त्याऐवजी पुरुष फेलोंची निवड करण्यात येईल.

**(९) फेलोंचा दर्जा :-** शासकीय सेवेतील गट-अ अधिकाऱ्यांच्या समकक्ष असेल.

**(१०) नियुक्ती संदर्भातील कार्यवाही :-** फेलोंच्या निवडीसाठी जाहिरात देणे, अर्ज मागविणे, अर्जाची छाननी करणे, परीक्षा घेणे, उमेदवारांची निवड करणे, नियुक्ती देणे यासाठी तसेच सदर कार्यक्रम राबविण्याकरिता कंत्राटी तत्वावर मनुष्यबळ नियुक्ती, आवश्यकतेनुसार वेबसाईट/वेबपेज तयार करणे व अद्ययावत ठेवणे, कार्यक्रमाचा प्रचार व प्रसिध्दी या कामांसाठी आवश्यक संस्थांची नेमणूक इत्यादी बाबतची कार्यवाही 'अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई' यांच्यामार्फत पार पाडण्यात येईल.

**(११) निवडीची कार्यपद्धती :-**

(i) फेलोशिपसाठी अर्ज करणाऱ्या उमेदवारास ऑनलाईन अर्ज करून ऑनलाईन परीक्षा शुल्क भरावे लागेल. तसेच ऑनलाईन अर्ज करताना आधार कार्ड किंवा अन्य ओळखपत्र असणे अनिवार्य आहे.

(ii) परीक्षा शुल्क भरणाऱ्या उमेदवारास ऑनलाईन वस्तुनिष्ठ चाचणी परीक्षा Online (Objective Test) द्यावी लागेल.

(iii) ऑनलाईन परीक्षा देण्याची कार्यपद्धती संचालनालयाच्या mahades.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर जाहीर केली जाईल व त्यातील अटी व शर्तीचे उमेदवाराने पालन करणे आवश्यक राहील.

(iv) यापूर्वी मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रमात काम केलेले फेलो पुनश्चः या कार्यक्रमांतर्गत फेलो निवडीसाठी पात्र असणार नाहीत. तसे फेलोंनी अर्जात नमूद करणे आवश्यक राहील.

(v) वस्तुनिष्ठ चाचणी परीक्षेत उत्तीर्ण सर्वाधिक गुण मिळविणाऱ्या सुमारे २१० उमेदवारांना दिलेल्या विषयांपैकी एका विषयावरील निबंध विहीत तारखेस विहीत वेळेत ऑनलाईन पध्दतीने सादर करावा लागेल.

(vi) वस्तुनिष्ठ चाचणी परीक्षेत उत्तीर्ण सर्वाधिक गुण मिळविणाऱ्या २१० उमेदवारांची मुलाखत मुंबई येथे घेण्यात येईल.

(vii) वरील २१० उमेदवारांच्या मुलाखतींसाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात यावी :-

१. आयुक्त, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई : अध्यक्ष
२. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई : सदस्य
३. विशेष कार्य अधिकारी, मुख्यमंत्री सचिवालय : सदस्य
४. मुख्यमंत्री सचिवालयाने नामनिर्देशित केलेला उपसचिव अथवा त्यावरील दर्जाचा एक अधिकारी : सदस्य *
५. नियोजन विभागाने नामनिर्देशित केलेला उपसचिव अथवा त्यावरील दर्जाचा एक अधिकारी : सदस्य *
६. अर्थ व सांख्यिकी संचालनालयाने नामनिर्देशित केलेला गट अ दर्जाचा एक अधिकारी : सदस्य *
७. आय आय टी, मुंबई यांचा एक प्रतिनिधी : सदस्य
८. मुख्य संशोधन अधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय : सदस्य सचिव

**संबंधित विभागाने त्यांना नामनिर्देशित करणे आवश्यक राहील.*

(viii) मुलाखतीच्या वेळी शैक्षणिक अर्हतेसोबत उमेदवाराची सामाजिक व सार्वजनिक कामासंबंधात बांधिलकी, सशक्त चारित्र्य, सकारात्मक दृष्टिकोन, संघ भावनेने काम करण्याची वृत्ती, संबंधित कामाचा अनुभव, सदर कार्यक्रमासाठी त्याची योग्यता या आणि इतर बाबी विचारात घेतल्या जातील.

(ix) अंतिम निवड करताना वस्तुनिष्ठ चाचणी, निबंध व मुलाखत यासाठी अनुक्रमे ३०, २० व ५० असे गुण राहतील.

(x) उमेदवारांची अंतिम निवड करताना दोन उमेदवारांना समान गुण प्राप्त झाल्यास महाराष्ट्राचा अधिवासी असलेल्या उमेदवाराला प्राधान्य देण्यात येईल.

(xi) एकूण ६० उमेदवारांची अंतिम निवड करण्यात येईल.

(xii) निवड झालेल्या फेलोपैकी आवश्यकतेनुसार निवडक २० जिल्ह्यामध्ये प्रत्येकी दोन ते तीन फेलोंचा गट नियुक्त करण्यात येईल. या गटातील एक फेलो संबंधित जिल्हाधिकारी व एक ते दोन फेलो मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद यांच्या अधिनस्त काम पाहतील.

**(१२) फेलोशिप कार्यक्रमासाठी नियुक्तीचा कालावधी :-**

फेलोंची नियुक्ती १२ महिने कालावधीसाठी असेल. यामध्ये वाढ करण्यात येणार नाही. तसेच फेलो रुजु झाल्याच्या दिनांकापासून १२ महिन्यांनी त्याची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

**(१३) विद्यावेतन (छात्रवृत्ती) :-**

सदर कार्यक्रमांतर्गत निवड झालेल्या फेलोंना दरमहा मानधन रुपये ५६,१००/- व प्रवासखर्च रुपये ५,४००/- असे एकत्रित रुपये ६१,५००/- छात्रवृत्तीच्या स्वरुपात देण्यात येतील.

**(१४) शैक्षणिक कार्यक्रम :-**

शैक्षणिक कार्यक्रम हा फेलोशिप कार्यक्रमाचा अविभाज्य भाग असेल. निवड झालेल्या फेलोंसाठी आयआयटी, मुंबई यांच्या सहकार्यातून स्वतंत्र सार्वजनिक धोरण या विषयातील पदव्युत्तर प्रमाणपत्र अभ्यासक्रम आयोजित केला जाईल. या कार्यक्रमांतर्गत नियुक्त केलेल्या ठिकाणी काम करताना फेलोंना उपयोगी पडतील अशा विविध विषयांवर ऑफलाईन व ऑनलाईन व्याख्यानांचे आयोजन केले जाईल. ऑफलाईन व्याख्याने फेलोशिपच्या सुरुवातीस दोनआठवडे तसेच सहा महिन्यानंतर व शेवटी प्रत्येकी एक आठवडा, आयआयटी, मुंबई येथे आयोजित करण्यात येतील. याव्यतिरीक्त ऑनलाईन व्याख्याने वर्षभरात कार्यक्रमाच्या गरजेनुसार शनिवार, रविवार किंवा सार्वजनिक सुटीच्या दिवशी आयोजित करण्यात येतील. ऑफलाईन व ऑनलाईन सर्व व्याख्यानांना उपस्थित रहाणे फेलोंना अनिवार्य आहे. या कार्यक्रमाचा उद्देश फेलोंना सार्वजनिक हितासाठी काम करताना व धोरण निर्मिती करताना योग्य

साधने व शास्त्रीय पध्दतींचा वापर करण्यासाठी मदत करणे तसेच विकास कार्यक्रम राबविण्यासाठी आवश्यक ज्ञान, कौशल्ये व क्षमता वाढविणे हा असेल.

सदर पदव्युत्तर प्रमाणपत्र अभ्यासक्रम यशस्वीपणे पूर्ण केल्यानंतर फेलोंना संबंधित संस्थेमार्फत स्वतंत्र प्रमाणपत्र दिले जाईल. शासनाकडून फेलोशिप कार्यक्रम यशस्वीपणे पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र मिळविण्यासाठी नियुक्ती करण्यात आलेल्या संबंधित कार्यालय वा प्राधिकरणासोबत फेलोंनी करावयाचे काम (फील्ड वर्क) व शैक्षणिक कार्यक्रम हे दोन्ही फेलोशिपच्या कालावधीत यशस्वीपणे पूर्ण करणे फेलोंसाठी अनिवार्य राहील.

**(१५) इतर कार्यक्रम :-**

शैक्षणिक कार्यक्रमाव्यतिरिक्त परिचय सत्र, विविध सामाजिक संस्थांना भेटी, मान्यवर व्यक्तींशी संवाद, प्रमाणपत्र प्रदान या उद्देशाने वर्षभरात इतर काही कार्यक्रमांचे आयोजन केले जाईल.

**(क) फेलोंच्या नियुक्तीच्या अनुषंगाने विहित करण्यात येत असलेल्या अटी व शर्ती :-**

(१) निवड प्रक्रियेच्या कोणत्याही टप्प्यावर संबंधित अधिकाऱ्यांवर निवडीसाठी कोणत्याही प्रकारे दबाव आणण्याचा प्रयत्न करणाऱ्या उमेदवारास निवड प्रक्रियेतून बाद करण्याचा अधिकार अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र शासन यांचा राहील.

(२) फेलोंच्या नियुक्तीनंतर अ) पोलीस पडताळणी अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत रुजू झाल्यावर करण्यात येईल. ब) नोंदणीकृत वैद्यक व्यावसायिकाचे सक्षमतेचे प्रमाणपत्र रुजू होताना सादर करणे बंधनकारक राहील. क) फेलोंची शैक्षणिक अर्हता, इत्यादीच्या सत्यतेबद्दल कागदपत्रांची तपासणी (मुलाखतीच्या वेळी) इत्यादी बाबी अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांच्या मार्फत करण्यात येतील.

(३) या कार्यक्रमांतर्गत निवड करण्यात आलेल्या उमेदवाराला १२ महिन्यांसाठी कराराने फेलोशिप देऊन नियुक्ती करण्यात येईल. सदर १२ महिन्यांच्या कालावधीत शैक्षणिक कार्यक्रमाचा कालावधी तसेच फेलोशिप कार्यक्रमांतर्गत राबविल्या जाणाऱ्या इतर उपक्रमांचा कालावधी अंतर्भूत धरण्यात येईल. फेलोशिपच्या कालावधीत मानधनामध्ये कोणतीही वाढ अनुज्ञेय असणार नाही.

(४) निवड झाल्याचे पत्र मिळाल्यानंतर, निर्देशित केलेल्या ठिकाणी व विहीत मुदतीत उमेदवारास स्वखर्चाने हजर व्हावे लागेल. कोणत्याही परिस्थितीत यात सवलत दिली जाणार नाही. निर्देशित ठिकाणी व विहीत मुदतीत हजर न राहणाऱ्या उमेदवाराची नियुक्ती रद्द केली जाईल. या संदर्भात अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र शासन यांनी घेतलेला निर्णय अंतिम राहील.

(५) उमेदवारांकडून विभाग / कार्यालय / प्राधिकरण बाबत पसंतीक्रमाची विचारणा करण्यात आली तरी, शासनाच्या प्राथमिकता तसेच उमेदवाराची योग्यता व उपयुक्तता विचारात घेऊन उमेदवारास विभाग / कार्यालय / प्राधिकरण नेमून दिले जाईल. याबाबत अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र शासन यांचा निर्णय अंतिम राहील. यासंदर्भात संबंधित अधिकाऱ्यांवर कोणत्याही प्रकारे दबाव आणण्याचा प्रयत्न करणाऱ्या उमेदवारास निवड झाल्यानंतरही नियुक्ती न देण्याचा व निवड प्रक्रियेतून बाद ठरविण्याचा अधिकार अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र शासन यांना राहील.

(६) ज्या विभाग / कार्यालय / प्राधिकरणा मध्ये फेलोंची नियुक्ती करण्यात येईल त्या कार्यालयाने संबंधित फेलोला फेलोशिपच्या कार्यकाळात संगणकीय सुविधा इंटरनेट जोडणीसह उपलब्ध करून द्यावी. फेलोचा कार्यकाळ संपताच फेलोकडून सदर संगणकीय सुविधा काढून घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहील.

(७) फेलोंना फेलोशिपच्या कालावधीत तात्पुरते ओळखपत्र व तात्पुरता अधिकृत शासकीय ई-मेल आयडी देण्यात येईल. संबंधित फेलोचा कार्यकाळ संपताच फेलोकडे असणारे ओळखपत्र संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र शासन यांना परत करणे आवश्यक राहील. तसेच, फेलोला देण्यात आलेल्या ई-मेल आयडीची सुविधा बंद करण्यात येईल.

(८) फेलोंना महागाई भत्ता, अंतरिम किंवा वेतन आयोगाचे सेवा विषयक लाभ अनुज्ञेय असणार नाहीत.

(९) फेलोंना फेलोशिप कालावधीत वैद्यकीय प्रतिपूर्ती अनुज्ञेय असणार नाही.

(१०) फेलोशिप कालावधीतील सेवा ही निवृत्तीवेतन, बोनस, रजा प्रवास सवलत, रजा रोखीकरण किंवा अन्य कोणत्याही आर्थिक लाभासाठी व सेवा विषयक लाभांसाठी विचारात घेतली जाणार नाही.

(११) व्यवसाय कराची वसुली फेलोच्या मानधनातून करण्यात येणार नाही. (वित्त विभाग, परिपत्रक क्र.पीएफटी- १०७६/प्र.क्र.२९/७६, दिनांक ५/६/१९७६)

(१२) फेलोंचा समूह वैयक्तिक अपघात विमा जोखीम या योजनेंतर्गत विमा उतरविण्याबाबत वित्त विभागाच्या नियमानुसार कार्यवाही करण्यात येईल.

(१३) सम संवर्गातील अधिकारी जी कर्तव्ये बजावतात, ती कर्तव्ये फेलोंची राहतील. त्यानुसार फेलो कार्यालयातील सर्व नियमांचे पालन करून निर्धारीत वेळेनुसार कार्यालयात उपस्थित राहून कर्तव्य पार पाडतील. तसेच, या कालावधीत फेलो पूर्णवेळ अभ्यासक्रम, खाजगी व्यवसाय व अर्ध / पूर्ण वेळ नोकरी करु शकणार नाहीत. कार्यालयीन कामकाजाच्या दिवसा व्यतिरिक्त सार्वजनिक सुट्टीच्या दिवशी जर कार्यालयीन कामकाजासाठी कर्तव्य बजावावे लागले, तर त्यासाठी फेलोंना कामावर हजर राहावे लागेल. त्याकरिता कुठल्याही प्रकारचे अतिरिक्त मानधन अनुज्ञेय असणार नाही.

(१४) फेलोशिपच्या १२ महिन्यांच्या कालावधीत फेलोंना ८ दिवसांची किरकोळ रजा अनुज्ञेय राहील. अन्य कोणत्याही प्रकारची रजा त्यांनी उपभोगल्यास त्यानुसार मानधनातून कपात करण्यात येईल.

(१५) फेलोंनी मुख्यालयात उपस्थित राहाणे आवश्यक असून, संबंधित प्राधिकृत अधिकाऱ्याच्या पूर्वपरवानगीशिवाय त्यांना मुख्यालय सोडता येणार नाही.

(१६) फेलोंचा कालावधी बारा महिन्यांचाच असेल. फेलोंची निवड बारा महिन्याचा कालावधी समाप्त झाल्यानंतर आपोआप संपुष्टात येईल. फेलोची निवड ही फक्त तात्पुरत्या स्वरुपाची असेल. फेलोंना सरकारी नोकरीत समाविष्ट होण्याचा हक्क प्राप्त होणार नाही.

(१७) फेलोशिपच्या कालावधीत फेलोचा मृत्यू झाल्यास वा अपंगत्व आल्यास, त्यांच्या कर्तव्य कालावधीतील छात्रवृत्ती / विद्यावेतनाची रक्कम त्यांच्या घोषित कुटुंबियांना देण्यात येईल. परंतु, सानुग्रह अनुदान किंवा अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्यात येणार नाही.

(१८) फेलोशिपच्या कालावधीत फेलोंना राजीनामा द्यावयाचा असल्यास किमान एक महिना अगोदर स्वाक्षांकित अर्ज नियुक्ती केलेल्या कार्यालयामार्फत संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र शासन यांना सादर करावा लागेल. अशा प्रकारे अर्ज सादर केला नाही तर त्या महिन्याची छात्रवृत्ती अदा केली जाणार नाही.

(१९) राजीनामा किंवा इतर कारणास्तव एखाद्या फेलोची फेलोशिप खंडित झाल्यास सदर फेलोस शैक्षणिक कार्यक्रमही पूर्ण करता येणार नाही.

(२०) फेलोंनी केलेल्या कामगिरीबाबत, फेलोशिपच्या कालावधीत तसेच कार्यक्रमाची मुदत संपल्यानंतरही पूर्ण गुप्तता बाळगण्यात येईल. फेलोशिप कालावधीत त्यांनी केलेली कामगिरी / संशोधन / जमा केलेली माहिती / मिळालेल्या माहितीच्या आधारे तयार केलेले मुद्दे याबाबत फेलोशिपच्या कालावधीत किंवा त्यानंतरही त्यांना कोणतीही माहिती प्राधिकृत अधिकाऱ्याव्यतिरिक्त कोणासही देता येणार नाही.

(२१) फेलोशिपच्या कालावधीत फेलो कोणत्याही राजकीय चळवळीत भाग घेऊ शकणार नाही. तसेच त्यांच्याकडून कोणतेही अशोभनीय कृत्य घडणार नाही, याची त्यांनी दक्षता घ्यावी. फेलोंनी सचोटी राखणे, निवडणुकीत भाग न घेणे, वृत्तपत्रांना माहिती न देणे, कोणत्याही स्वरूपाची देणगी न घेणे, इ. बाबत दक्षता घ्यावी.

(२२) फेलोंना राज्यातील प्रकल्पांना / आस्थापनांना भेट देताना नियुक्ती केलेल्या कार्यालयाच्या प्रमुखाची पूर्वमंजुरी घ्यावी लागेल. यासंदर्भात ज्या प्रकल्पांना / आस्थापनांना भेट द्यावयाची आहे, त्यांच्या प्रमुखाला त्याबाबतची पूर्वकल्पना द्यावी.

(२३) फेलोशिपच्या संपूर्ण कालावधीत तसेच त्यानंतर फेलोंनी केलेल्या कोणत्याही स्वरूपाच्या गुन्हेगारी व बेकायदेशीर कृत्यांच्या अनुषंगाने त्यांच्यावर करण्यात येणाऱ्या कारवाईची जबाबदारी सर्वस्वी फेलोंवर राहील.

(२४) फेलोंच्या फेलोशिपच्या कालावधीत असमाधानकारक कामगिरी किंवा गैरशिस्तीच्या कारणामुळे कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांचा फेलो म्हणून (नियुक्ती) फेलोशिप समाप्त करण्यात येईल.

(२५) फेलोंना प्रत्येक महिन्यात त्यांच्या कामगिरीचा अहवाल ईमेल द्वारे नियुक्ती केलेल्या कार्यालयाच्या प्रमुखास व संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना सादर करावा लागेल.

(२६) अहवालात फेलोंनी महिनाभरात केलेले कामकाज तसेच त्या कामातून ते काय शिकले व त्या अनुषंगाने त्यांच्या सूचना याबाबत नोंद ठेवणे अपेक्षित आहे.

(२७) फेलोच्या नियुक्तीनंतर प्रत्येक तीन महिन्यांनी फेलोंच्या कामगिरीचे मूल्यमापन संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र शासन हे करतील.

(२८) शासनाच्या हितासाठी या अटी शर्तीमध्ये बदल / वाढ करण्यात आल्यास, त्या फेलोंवर बंधनकारक राहतील.

(२९) उपरोक्त अटी / शर्ती मान्य आहेत, या आशयाचे संमतीपत्र नियुक्ती देण्यापूर्वी फेलोंकडून घेण्यात येईल.

**३.** मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रमाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी उपमुख्यमंत्री कार्यालयातील विशेष कार्य अधिकारी यांना एका समन्वयकाची तसेच सोशल मिडीया एक्सपर्ट ची सेवा कंत्राटी तत्वावर घेता येईल. तसेच अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र शासन यांना आवश्यकतेनुसार कमाल ५ इतक्या मनुष्यबळ मर्यादेत कंत्राटी तत्वावर सेवा घेता येतील.

**४.** शैक्षणिक कार्यक्रम व इतर कार्यक्रम आयोजनाकरीता येणारा खर्च तसेच आवश्यकतेनुसार तज्ञ मार्गदर्शकांना निमंत्रित केल्यास त्यांच्या मानधनावरील खर्च मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. या कार्यक्रमांसाठी आवश्यकतेनुसार निवास व भोजन व्यवस्था करणे शक्य न झाल्यास प्रत्येक फेलोस रुपये २,२५०/- (प्रति दिन) या दराने भत्ता देण्यात येईल.

**५.** आय.आय.टी., मुंबई मार्फत फेलोंसाठी राबविण्यात येणाऱ्या पदव्युत्तर प्रमाणपत्र अभ्यासक्रमासाठी अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र शासन यांच्या जास्तीत जास्त तीन अधिकारी/कर्मचारी यांना सहभागी होता येईल. याद्वारे संचालनालयाच्या अधिकारी/कर्मचारी यांच्या क्षमतावर्धनामुळे पुढील कार्यकाळात शासनास त्यांच्या सेवा अधिक उपयुक्त ठरु शकतील.

**६.** सदर योजनेच्या अंमलबजावणी करिता येणारा खर्च मागणी क्रमांक ओ - ९, ३४५४- जनगणना सर्वेक्षण व सांख्यिकी, ०२- सर्वेक्षण व सांख्यिकी, ११२-आर्थिक सल्ला व सांख्यिकी, (०१) अर्थ व सांख्यिकी संचालनालय, (०४)- मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रम (दत्तमत) (योजनांतर्गत योजना) (३४५४०५९२) या लेखाशीर्षाखाली मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

**७.** मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रमाच्या प्रयोजनार्थ अर्थसंकल्पात विहित अर्थसंकल्पीय पद्धतींचे पालन करून आर्थिक तरतूद करणे याबाबतची कार्यवाही नियोजन विभागाच्या अधिपत्याखालील अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र शासन या कार्यालयामार्फत करण्यात येईल.

**८.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३८/२०२५/व्यय-८, दि.२७/०१/२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**९.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२५०४०३१७४०५६४७१६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0CF60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2025.04.03 17:41:53 +05'30'

**(चारुशीला चौधरी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास, गृहनिर्माण व सार्वजनिक बांधकाम (सा.उ.)) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
५. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,
७. सर्व मा. संसद सदस्य / विधीमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
११. आयुक्त, अर्थ व सांख्यिकी संचालनालय , मुंबई,
१२. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६ वा मजला, विधानभवन, मुंबई,
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२ मुंबई / नागपूर,
१४. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर,
१५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१६. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / लेखाकोष भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई,
१८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१९. सर्व विभागीय आयुक्त,
२०. सर्व जिल्हाधिकारी,
२१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२३. संकायाध्यक्ष (शैक्षिक प्रसार), आय. आय. टी., पवई, मुंबई-४०००७६,
२४. आय. आय. एम, नागपूर, मिहान, नागपूर-४४११०८,

२५. बहुजन समाज पक्ष, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१,

२६. भारतीय जनता पक्ष, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बरॅक नं.१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-२०,

२७. भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस. व्ही. पटेल रोड, मुंबई-४,

२८. भारतीय कम्युनिस्ट पक्ष (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, वरळी, मुंबई-१३,

२९. भारतीय राष्ट्रीय काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५,

३०. राष्ट्रवादी काँग्रेस पक्ष, राष्ट्रवादी भवन, मुंबई-०१,

३१. शिवसेना, बाळासाहेब भवन, मुंबई-३२,

३२. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८,

३३. निवडनस्ती, कार्यासन-१४२६.

*****